**महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठातील दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामकाजास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.साप्रवि-१२०२३/३/२०२४/साप्रवि(कक्ष-६)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १८ जून, २०२४.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुख्यालय, मुंबई यांनी त्यांच्या मुमाअ-२०२३/सं.क्र.११३९/०२, दिनांक ०५ जानेवारी, २०२४ अन्वये महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खुंडपीठ यांच्या कार्यालयातील दुरुस्ती व नूतनीकरणाचा प्रस्ताव शासनास प्रशासकीय व वित्तीय मान्यतेस्तव सादर केला होता. महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ या कार्यालयातील विद्युत दुरुस्ती उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग, नवी मुंबई व कार्यालयातील दुरुस्ती आणि नूतनीकरणाचे कामकाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल (भिंगारी) यांचेकडून करण्यासाठी अंदाजपत्रके मागविण्यात आली होती. महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ या कार्यालयातील दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामकाजास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासंदर्भात आता शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ या कार्यालयातील दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामकाजासाठी उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग, नवी मुंबई व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल (भिंगारी) यांचेकडून प्राप्त खालील अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकांचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | दुरुस्तीची/नूतनीकरणाची बाब | सां.बा. विभागाचे संबंधित कार्यालय | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | Est. No. १३१०५९/२०२३-२४. Providing Repairs to E.१ of Information Commission Office at ५th floor of Annex Building, Kokan Bhavan at CBD Belapur, Navi Mumbai. | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग, नवी मुंबई | ८८,५७३.०० |
| २ | Repairs to the office of State Information Commission at ५th floor, Kokan Bhavan, Annex Building for Miscellaneous Plumbing & Carpentry Works. | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल (भिंगारी) | १,८१,२३५.०० |
| | | **एकूण:-** | **२,६९,८०८.००** |

२. उपरोक्त खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या खर्च खाती टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १५ एप्रिल, २०१५ वित्तीय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक १६, नियम क्रमांक ६४ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०६१८१५३३१७०४०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्य आदेशानुसार व नांवाने,

ROSHANI DINESH KADAM PATIL

Digitally signed by ROSHANI DINESH KADAM PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=16D26A3CE7C86CC341C246E6BB468A80B20659CCB13144AF609F03226E90BA0C, cn=ROSHANI DINESH KADAM PATIL
Date: 2024.06.18 15:49:10 +05'30'

**(रो. दि. कदम-पाटील)**
**शासनाच्या उप सचिव**

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. उप सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, मुख्यालय, मुंबई-३२.
५. उप सचिव, महाराष्ट्र राज्य माहिती आयोग, कोकण खंडपीठ, नवी मुंबई.
६. जिल्हा कोषगार अधिकारी, ठाणे.
७. निवड नस्ती, सा.प्र.वि., कार्या.-माहिती (६).